# GUNGADHUR
# RUDIMENTS OF GRAMMAR.





# लघुव्याकरण.

हें पुस्तक शाळांत पढणाऱ्या

बालकांकरितां

गंगाधर रामचंद्र टिळक ह्यांनीं

केलें.



त्याची ही पुनरावृत्ति सुधारून

रत्नागिरी एथें जगन्मित्र

छापखान्यांत छापिली.





शके १७८१ सन १८५९

## आर्या.

व्याकरणथोरपाहूं, जानां होतील फार आयास॥
धन हीं बहुत बि लागे, तैसा अभ्यास हीकरायास॥१॥
ह्यास्तव संक्षेपें हें, कथिलें व्याकरण लोक हित करसें॥
थोड्या धनेंश्रमानें, वाटे मजला असे अथीं करसें॥२॥

## श्लोक.

भाषाख्य सिंधूंतिल शब्दरत्नें,
लोकोपकारास्तव फार यत्नें॥
घेऊन गंगाधर बालकांशी,
देतो अशा सुंदर भूषणांशी॥२॥

# प्रस्तावना.

व्याकरणाचा उपयोग सर्व मनुष्यांस आहे. स्व भाषेचें व्याकरण शिकल्यापासून आपल्या भाषेचें ज्ञान चांगलें होतें, शब्द किंवा अशब्द समजतें, इतकेंच नव्हे; तर कोणती ही परभाषा शिकणें फार सुलभ पडतें. ह्याजकरितां स्वभाषेच्या व्याकरणाचें ज्ञान करून घेणें, हें मनुष्यमात्रास योग्य आहे.

सांप्रत थोडक्यांत व्याकरणाच्या मूळतत्वांचें ज्ञान होण्यासाठिं बाळव्याकरणाचें पुस्तक आहे, परंतु तें शिकल्यानें सर्वत्र निर्वाह होत नाहीं; ह्याजकरितां गंगाधर शास्त्री, दादोबा ह्यांच्या व्याकरणांतील कांहीं विषय पहावे, तर ते मोठ्या प्रौढ संस्कृत शब्दांनीं भरलेले असून फारच लांब आहेत; ह्यामुळें शिकणारांच्या बाळबुद्धीस समजत नाहींत, व स्मरणांत

ही ग्रहान नाहींत, म्हणून ग्रंथावरून व्याकरण कर ण्यास अडचण न पडण्यासारिखें लहानसें व्याक रण असण्याची बहुतांची इच्छा पाहून, हें पुस्तक केलें आहे. ह्याच्या जसजशा आवृत्ति छापत जा- तील तसतशी ह्याची अधिक अधिक सुधारणा हो त जाईल.

हें पुस्तक व्याकरण शिकणाऱ्या बालकांचे पु- ष्कळ श्रम कमी होण्यास उपयोगीं पडावें, अशी- जगन्नियंत्या परमेश्वराजवळ ग्रंथकर्त्याची प्रार्थ ना आहे, ती त्यानें आशीर्वाद देऊन सिद्धीस नेल्या- वें ग्रंथकर्ता श्रवण करील, तर त्याच्या सर्व श्रमा- चा परिहार होईल.



# सूचना.

ही पुनरावृत्ति मीं यथामति सुधारून मेहरबान मेजर क्यांडी साहेब मराठी ट्रान्सलेटर इज्युकेशनल डिपार्टमेंट ह्यांजकडे तपासण्याकरितां पाठविली, ती त्यांनीं लोकोपकारार्थ राजमान्य राजश्री परशराम पंत तात्या गोडबोले ह्यांच्या सह्यानें पुष्कळ श्रम घेऊन शोधिली; व कित्ता एक विषय अधिक घातला; ती मत मेहरबान डेरेक्टर आफ पब्लिक इन्स्ट्रक्शन् साहेब ह्यांनीं पसंत केल्यावरून छापिली.

ग्रंथकर्ता.



# महाराष्ट्र भाषेचें व्याकरण.

व्याकरण म्हणून एक विद्या आहे, जी शिकल्यानें बोलणें व लिहिणें शब्द किंवा अशुद्ध हें समजतें. ह्या विद्येचे वर्णविचार, शब्दविचार, आणि वाक्यरचना, असे तीन भाग केले आहेत.

## भाग पहिला, वर्णविचार.

अ पासून ज्ञ पर्यंत बावन्न वर्ण आहेत, ह्यांचे स्वर आणि व्यंजनें असे दोन भेद आहेत. वर्णास कार प्रत्यय लागून अकार, ककार, हकार, अशीं नावें होतात.

### स्वर.

ज्यां शिवाय अक्षर होत नाहीं, व स्वतंत्रतेनें ज्यांचा स्पष्ट उच्चार करितां येतो, असे जे वर्ण अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, अं,* अः, ते स्वर हो-

---

* अं, अः हे स्वतंत्र स्वर नाहींत, परंतु लोकांत बारा खड्यांमध्यें धरले आहेत, म्हणून एथें स्वरांत घातले आहेत.

लृ. ह्यांचे ऱ्हस्व, दीर्घ, संधिस्वर, अनुस्वार, आणि वि
सर्ग, असे पांच भेद आहेत.

## ऱ्हस्वस्वर.

अ, इ, उ, ऋ, लृ, हे पांच ऱ्हस्व[+] स्वर, हेच मुळचे मु
ख्य होत.

## दीर्घस्वर.

आ, ई, ऊ, ॠ, ॡ[*], ह्यांना दीर्घ स्वर म्हणतात.

## संधिस्वर.

ए, ऐ, ओ, औ, हे चार संधिस्वर[:] किंवा संयुक्त स्वर
आहेत.

---

+ ऱ्हस्व स्वरांना लघु (एक मात्रक) आणि बाकीच्यांस गुरु (द्वि-
मात्रक) असें म्हणतात.

* लृ ला दीर्घत्व नाहीं असा संस्कृतांत नियम आहे.

:: एकजातीय दोन मुख्य स्वर मिळून दीर्घ स्वर होतो पण भिन्नजा
तीय दोन स्वर मिळून संधिस्वर होतो, असें मारूलभाषेतील कितीएक
अलीकडील पंडितांचें मत आहे, म्हणजे अ आणि आ मिळून आ, इत्या
दि जसें मूळ+अक्षर=मुळाक्षर, हरि+इच्छा=हरीच्छा, भानु+उद
य=भानूदय, पितृ+ऋण=पितॄण, ह्याप्रमाणें अ आणि इ मिळून ए

# अनुस्वार आणि विसर्ग.

अं ह्यास अनुस्वार आणि अः ह्यास विसर्ग असें म्हणतात, अनु म्हणजे मागून, आणि स्वर म्हणजे-ध्वनि, ह्यावरून कोणत्याही स्वराच्या उच्चारणानंतर नाकांतून जो ध्वनि निघतो, त्याला अनुस्वार म्हणतात. तसेंच कोणत्याही स्वराच्या उच्चारानंतर हकारासारिखा ध्वनि निघतो त्यास विसर्ग असें म्हणतात. लक्षणांत सांगितलेला अ हा स्वर अनुस्वार किंवा विसर्ग नव्हे; परंतु अनुस्वार आणि विसर्ग ह्यांचा बोध कोणत्याही स्वराश्रया वांचून होत नाहीं, ह्याज करितां कोणता तरी स्वर घ्यावयाचा, तो पहिलाच घेण्याची रूढि आहे, म्हणून तोच एथें घेतला आहे. अनुस्वार

---

इत्यादि जसें राज + ऋक्षा = राजर्क्षा, एक + एक = एकैक, पर + उपकार = परोपकार, जल + ओघ = जलौघ. ह्या उदाहरणांस संस्कृतांत अच्संधि म्हणतात; ह्यांतील कित्येकांस बाधकें आहेत, उ॰ मृत + अंड = मार्तंड इ॰; परंतु त्यांचा समावेश अशा लहान पुस्तकांत होणें कठिण आहे.

चें चिन्ह अक्षरावर एक बिंदु आणि विसर्गाचें चिन्ह-अक्षरा पुढें दोन बिंदु असें असतें. अनुस्वाराचा उच्चार पुढील व्यंजनाच्या वर्गाच्या शेवटल्या व्यंजना प्रमाणें होतो, य किंवा ल पुढें असल्यास त्यां सारिखाच होतो, आणि र, व, श, ष, स, ह, ज्ञ, ह्यांतील एकादें व्यंजन पुढें असल्यास व सारिखा होतो. अनुस्वारा पुढें स्वर येतच नाहीं; उ० अंक (अङ्क), वंचना-(वञ्चना), कंठ (कण्ठ), संत (सन्त), रंभा (रम्भा), संयोग (सय्योग), संलग्न (सल्लग्न), संरक्षण (सव्रक्षण), संवाद, संशय, दंष्ट्रा, कंस, सिंह, संज्ञा, इ० परंतु केवळ मराठी शब्दांतील किती एक शब्दांच्या ज्या स्वराचा उच्चार करतांना नाकांतून हलका ध्वनि निघतो त्यास्वरास अनुनासिक म्हणतात. त्याचें-ही चिन्ह अनुस्वारा सारिखें अक्षरावर एक बिंदु असें आहे; उ० धोंडा, मेंढा, करांची, घोड्यांकडे, तळें, पा-

गोटें, इ॰ विसर्गापुढें अवसान किंवा क, ख, प, फ, श, +ष, +स, क्ष, हीं व्यंजनें असतात असा नियम आहे; विसर्गाचा उच्चार अवसान पुढें असतां पूर्ण होतो आणि क, ख, प, फ, इत्यादि व्यंजनें पुढें असतां अर्धा होतो; उ॰ स्वतः, भयः, जायाः, दुःख, कः पदार्थ, निःसत्व, इत्यादि.

## व्यंजनें.

स्वराच्या आश्रया वांचून ज्यांचा उच्चार स्पष्ट होत नाहीं, असे जे अर्ध मात्रक वर्ण क्, ख्, ग्, घ्, ङ्, च्, छ्, ज्, झ्, ञ्, ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, त्, थ्, द्, ध्, न्, प्, फ्, ब्, भ्, म्, य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह्, ळ्, क्ष्, ज्ञ्, ते व्यंजनें होत; ह्यांत मूळ व्यंजनें क् पासून ळ् पर्यंत चवतीस असून, क्ष् आणि ज्ञ् हीं दोन संयुक्त व्यंजनें

+ श, ष, स, हीं व्यंजनें पुढें असल्यास विसर्ग न लिहितां दुणवाकुन, रामश्चंद्रः, निस्सत्व, असें लिहिणें अधिक प्रशस्त होय.

आहेत. क् पासून म् पर्यंत पांच पांच व्यंजनांचा एक एक असे पांच वर्ग, आणि त्यां शिवाय अकरा व्यंजनें, मिळून छत्तीस व्यंजनें आहेत.

## वर्णांचीं स्थानें.

जो वर्ण उच्चारण्यास जिभेच्या अग्राने किंवा तोंडांतील ज्या स्थानीं वायु आदळतो, तें त्या वर्णाचें स्थान होय. उ॰ अ, कवर्ग, ह, आणि विसर्ग, ह्यांचें कंठ+ स्थान; इ, चवर्ग, य, श, ह्यांचें तालु+ स्थान; ऋ, टवर्ग, र, ष, ळ, ह्यांचें मूर्धा+ स्थान; लृ, तवर्ग, ल, स, ह्यांचें दंत+ स्थान; उ, पवर्ग, ह्यांचें ओष्ठ+ स्थान; ङ, ञ, ण, न, म, आणि अनुस्वार, ह्यांचें नासिका+ स्थान; ए, ऐ, ह्यांचें कंठताः

---

+ मानेच्या आंतील ज्या प्रदेशांतून भक्षिलेले पदार्थ पोटांत उतरतात, त्या प्रदेशाच्या पुढल्या अंगास पड जिभेखालीं शब्दरूप करणारा वायु बाहेर येण्यास जो मार्ग आहे त्यास कंठस्थान म्हणतात; वरच्या दातांच्या मुळाशीं जिभेचें अग्र लावून तेथून ती वरच्या आंतल्यास लावून पश्चात्ये ओठाशी म्हणजे मध्यम उंच वरच्या-

लुस्थान; ओ, औ, ह्यांचें कंठोष्ठस्थान; व, ह्याचें दंतो ष्ठस्थान; च, छ, ज, झ, ह्यांचें दंत तालुस्थान जाणावें.

## अक्षर.

स्वर हे अक्षरें आहेत, व कोणत्या ही व्यंजनास कोणता ही स्वर जोडिला असतां अक्षर होतें, जसें क् ह्यास अ जोडिला असतां क होतो, आ जोडिल्यानें का होतो, इ जोडिल्यानें कि होते; इत्यादि ह्या प्रमाणें सर्व व्यंजनां विषयीं समजावें.

## जोडाक्षर.

दोन किंवा अधिक व्यंजनें स्वरास मिळून जें अक्षर होतें त्यास जोडाक्षर म्हणतात. ह्याज विषयीं

---

गें दुसरा उंच वटा जिभेस लागतो, तो व त्याच्या मागची उतरवीजागा ह्यांस तालुस्थान म्हणतात; आणि पूर्वी सांगितलेल्या दोन उंच वट्यां मधील जाग्यास मूर्धास्थान म्हणतात, दांतांच्या मुळा जवळील जो प्रदेश त्याला दंतस्थान म्हणतात; ओंठांस ओष्ठस्थान म्हणतात; मुखांतील ज्या स्थलीं नाकांत वायु जाण्यास द्वार आहे, त्या स्थानास नासिकास्थान म्हणतात; कंठ तालु, इत्यादि उभय स्थानें आहेत.

असा नियम आहेकीं, ज्या व्यंजनास दुसरें अक्षर जोडावयाचें असेल, तें प्रथम अर्धे व्यंजन लिहून त्या स दुसरें अक्षर जोडितात; व्यंजनाचा स्वाभाविक-काना मोडिला असतां अर्धे व्यंजन होतें; ज्याला काना नसतो त्यास खालीं किंवा त्या अक्षरा पुढें जोडावयाचें अक्षर लिहून, त्यावरील स्वाभाविक ओळ एक ठेवितात; उ० (व्‌य) व्य, (ज्‌ञ) ज्ञ, म्हणजे ज्ञ, (ल्‌ल) ल्ल, (ट्‌य) ट्य, (क्‌ष) क्ष, म्हणजे क्ष, (त्‌म्‌य) त्म्य, इत्यादि.

## भाग दुसरा. शब्दविचार.

एक अक्षर किंवा अनेक अक्षरांचा समुदाय यां पासून कांहीं अर्थ समजल्यास, त्या अक्षरास अथवा अक्षर समुदायास शब्द ह्मणतात; उ० ऊ, ऋ, पृ, आ, पे, मुलगा, कोण, चांगला, आहे, जवळ, इ० शब्दांचे, नाम, सर्वनाम, विशेषण, क्रिया

पद, आणि अव्यय, असे पांच भेद आहेत.

## नाम.

इतर शब्दांशीं[+] संबंध नसतां ज्या शब्दापासून वस्तूचा बोध होतो, (ती प्रत्यक्ष दिसो अगर तिचा मनाच्या ठायीं नुसता संस्कार होवो) त्या शब्दास नाम असें म्हणतात; उ॰ पशु, पक्षी, विष्णु, सूर्य, अहंकार, राम, इ॰. नामांत सामान्य आणि विशेष अशा दोन जाति आहेत, त्यांना लिंग, वचन, विभक्ति, हीं लागतात. ज्या नामाला विशेषण असतें त्या नामास विशेष्य म्हणतात.

## सामान्यनाम.

ज्या नामें करून सजातीय अनेक वस्तूंचा बोध होतो, त्याला सामान्य नाम म्हणतात; उ॰ पशु, पक्षी, गाय, मोर, पाखरूं, इत्यादि.

---

+ ह्या स्थळीं "शब्द" ह्या शब्दें करून सविभक्तिक शब्द मानिले आहेत. सर्वनामें, विशेषणें, धातु आदिकरून, ह्यांचा जसा आपआपल्या विशेष्य शब्दांशीं संबंध असतो, तसा नामाचा असत नाहीं.

## विशेषनाम.

ज्या नामें करून एकाच वस्तूचा बोध होतो, तें विशे-
षनाम होय; म्हणून ठेविलेलीं अथवा दिलेलीं जि-
तकीं नामें तितकीं सारीं विशेष नामें आहेत. उ॰ ईश्वर,
विष्णु, सूर्य, चीन, सह्याद्रि, भागीरथी, काशी, इत्यादि.

## लिंगें.

लिंगें तीन आहेत, पुल्लिंग, स्त्रीलिंग, आणि नपुंस
क लिंग. ज्या नामें करून पुरुषजातीचा बोध होतो,
किंवा ज्याला दाखविणारा तो हा शब्द लावितां येतो,
त्यास पुल्लिंगी नाम म्हणतात; उ॰ देव, तलाव, घोडा,
पर्वत, सोटा, इत्यादि. ज्या नामें करून स्त्रीजातीचा
बोध होतो, किंवा ज्याला दाखविणारा ती हा शब्द-
लावितां येतो, त्यास स्त्रीलिंगीनाम म्हणतात; उ॰ देवी,
तळी, घोडी, टेंकडी, काठी, इ॰. आणि ज्या नामें करू-
न पुरुषजातीचा किंवा स्त्रीजातीचा बोध होतना

हीं व ज्याला दाखविणारा तें हा शब्द लावितां येनो-त्याला नपुंसकलिंगी नाम म्हणतात; उ० दैवत, तळें, घोडें, टेंकाड, दांडकें, पागोटें, इ०. ज्याचें लिंग अमुकच असें नाहीं, पाहिजे तें लावितां येतें त्या नामास सामान्य लिंगी म्हणतात; उ० मी, तूं, आपण, इ०.

## वचन.

ज्या शब्दें करून पदार्थाच्या एकत्वाचा बोध होतो त्याला एकवचन, आणि अनेकत्वाचा बोध होतो त्याला अनेक* वचन अथवा बहुवचन म्हणतात; उ० राजा, राजे, इ०

## विभक्ति.

नामाशीं आणि क्रियेशीं संबंध सूचविणारे जे प-

---

* अनेकवचन आणि बहुवचन ह्यांचा अर्थ एकच; परंतु एक व्यक्तीस आदरानें बोलावयाचें असतां, मामलेदार आले, असा बहुवचनीं प्रयोग होतो. ह्या भेद ठेवण्याकरितां बहुत्वव्यक्तिवाचक शब्दाला अनेकवचन व एक व्यक्तीस आदराचें बोलणें असल्यास त्याला बहुवचन म्हणावें, असा भेद ठेवावा हें मला बरें दिसतें.

त्यय त्यांना विभक्ति म्हणतात, व हे प्रत्यय लागून सि द्ध झालेल्या शब्द रूपास ही विभक्ति म्हणतात. त्या प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी आणि संबोधन, अशा आठ आहेत. शब्दाचें जें मूळ रूप तीं प्रथमा, बाकीच्या विभक्तींचे प्रत्यय पुढें लि

| विभक्ति | एकवच० प्रत्यय | अनेकव० प्रत्यय |
|---|---|---|
| द्वि० | ला, स, तें. | ना, ला, स, तें. |
| तृ० | नें, एँ, शीं. | नीं, हीं, ईं, शीं. |
| च० | ला, स, तें. अर्थ. | ना, ला, स, तें. अर्थ |
| पं० | ऊन, हून. | ऊन, हून. |
| ष० | चा, ची, चें. चे, च्या, चीं. | चा, ची, चें. चे, च्या, चीं. |
| स० | आँत, ईं, आँ. | आँन, ईं, आँ. |
| संबो० | | नों, हो. |

ह्यांतील अनेक वचनीं प्रत्यय लागतांना, शब्दा

च्या अंत अनुनासिक होतो

वर जे विभक्ति प्रत्यय सांगितले, त्यांच्या अर्थी अनेक अव्ययें आहेत, तीं पुढें लिहितों.

द्वि॰ प्रत, लागीं, लागोनी, लागोनियां, कडे, इत्यादि.

तृ॰ योगें, द्वारें, करून, मुळें, करवीं, कडून, जवळून, इ॰

च॰ कारणें, करितां, साठीं, अर्थी, स्तव, नवल, पायीं, इ॰

पं॰ कडून[+], पेक्षां, वरून[+], मधून, पासून[+], आंतून[+], इ॰.

ष॰ संबंधी.

स॰ ठायीं, ठायां, कडे, मध्यें, विषयीं, आंत, वर, इ॰.

संबो॰ ए॰ व॰ पुल्लिं॰ आणि नपुं॰ अरे, रे, ए, अगा, गा, हे, अजी, स्त्री॰ अग, अगे, अगो, ग, गे, गो, अने॰ तीन लिंगीं; अहो, अगा, अजी, इत्यादि.

[*]अकारान्त पुल्लिंगी पर्वत शब्दाला विभक्ति ला-

---

[+] कडून, वरून, पासून, आंतून, इत्यादि शब्द दोन शब्द मिळून झा[ले आहेत], जसे कड, वर, पास, आंत, वरून, शान, ऊन, पासून, इ॰.

[*] [illegible] शब्दाच्या शेवटील अक्षराचा जो स्वर तो स्वर त्याचा-

[illegible]ल्या असतां, एकवचनीं व अनेकवचनीं पुढें लि-
हिल्या प्रमाणें रूपें होतात.

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र॰ | पर्वत. | पर्वत. |
| द्वि॰ | पर्वता-ला-स-तें. | पर्वतां-ना-ला-स-तें |
| तृ॰ | पर्वतें-नें-शीं, पर्वतें | पर्वतीं-हीं-शीं-नीं, पर्वतीं |
| च॰ | पर्वता-ला-स-तें. | पर्वतां-ना-ला-स-तें |
| पं॰ | पर्वता-हून. | पर्वतां-हून. |
| ष॰ | पर्वता-चा-ची-चें. -चे-च्या-चीं | पर्वतां-चा-ची-चें. -चे-च्या-चीं. |
| स॰ | पर्वतांत, पर्वतीं. | पर्वतांत, पर्वतीं. |
| संबो॰ | पर्वता. | पर्वतां-नों, पर्वत-हो. |

पर्वत ह्या नामाचें सामान्यरूप पर्वता हें जाणावें.
कारण द्वितीयादि विभक्तींचे प्रत्यय [illegible] एका

त्याचा अनक्षेप.

ब्द योगी आणि क्रियाविशेषण अव्ययें, ह्यांच्या ग्रह-णार्थ शब्दाचें जें रूप सिद्ध होतें, त्याला सामान्यरूप म्ह-णतात. हें भाणिवाचक विशेषनामास वरूढीतनसलं-ल्या संस्कृत नामांस प्रायः होत नाहीं. ज्याचें जें एकवच-नीं सामान्यरूप, तेंच त्याचें बहुधा एकवचनीं संबोध-नाचें रूप होतें.

षष्ठी विभक्तीच्या अंतीं सामान्य रूप होऊन, जेव्हां पुढें द्वितीयादि विभक्तींचा किंवा विभक्त्यंत शब्दांचा अथवा शब्दयोगी अव्ययांचा योग असतो, तेव्हां त्या सामान्य रूपास षष्ठ्यंत सामान्य रूप म्हणतात, उ॰ मनुष्याच्यानें, मनुष्याच्या हातानें, देवाच्या ठायीं, इ॰

## शब्दांचीं अनेकवचनें व सामान्यरूपें.

शब्दांच्या शेवटील स्वरांच्या आणि लिंगांच्या अ-रोधानें त्यांचीं प्रथमेचीं अनेकवचनें निरनिराळीं हो-तात, व सामान्यरूपें ही निराळीं होतात; जसें.

| | एकव० | अने० | सामा० | एकव० | अने० | सामा० |
|---|---|---|---|---|---|---|
| | देव | देव | देवा | साधु | साधु | साधू |
| | घोडा | घोडे | घोड्या | खाऊ | खाऊ | खाऊ |
| | काका | काका | काका | बापू | बापू | बापू |
| ु० | कवि | कवि | कवी | गहूं | गहूं | गव्हा |
| | माळी | माळी | माळ्या | लाडू | लाडू | लाडवा |
| | हत्ती | हत्ती | हत्ती | पू | पू | पुवा |
| | विद्यार्थी | विद्यार्थी | विद्यार्थ्या | लाहो | लाहो | लाह्यो |
| | चूल | चुली | चुली | पोथी | पोथ्या | पोथी -थ्यां |
| | जीभ | जिभा | जिभे -भां | धातु | धातु | धातू |
| ।० | माता | माता | माते -तां | वासरू | वासरे | वासरे |
| | मति | मति | मती | वायको | वायका | वायको -कां |
| | दूध | दुधें | दुधा | लेंकरूं | लेंकरें | लेंकरा |
| ० | बोट | बोटें | बोटा | पांखरूं | पांखरें | पांखरा |
| | पाणी | ० | पाण्या | तारूं | तारवें | तारवा |

|दही ” दह्या |पागोटें पागोटीं पागोट्या

हीं अनेक वचनें व सामान्य रूपें ध्यानांत ठेवून व र सांगितलेले विभक्ति प्रत्यय लावून ईश्वर, राजा, कवि, माळी, वायु, पेरू, डोहो, केळ, जागा, रीति, पोथी, धातु, वाळू, वस्तें, अन्रूफें, बायको, दूध, पाणी, लेंकरूं, सोनें, इ॰ शब्द विद्यार्थ्यांनीं चालवून दाखवावे.

## सर्वनाम.

वाक्यांत नामाचा वारंवार उच्चार न व्हावा, म्हणून त्याच्या स्थानीं जे शब्द योजितात त्यांस सर्वनामें म्हणतात; ह्यांचे पुरुषसर्वनाम, दर्शकसर्वनाम, संबंधी सर्वनाम, प्रश्नार्थकसर्वनाम, आणि सामान्यसर्वनाम असे पांच भेद आहेत. ह्यांस नामाप्रमाणें लिंग, वचन, विभक्ति, इत्यादिप्रकार्य होतात, परंतु संबोध-

+ कित्येक सर्वनामांचीं सामान्य रूपें सर्व विभक्तींचे प्रत्यय ग्रहणार्थ एकसारिखीं रहात नाहींत.

न नाहीं, व हीं ज्या नामा बद्दल येंनात, त्या नामास द्वितीयादि विभक्ति किंवा विभक्त्यर्थक अव्ययें लागलीं असलीं तर त्याच्या मागील सर्वनामास विशेषणा प्रमाणें सामान्य रूप होतें, त्यास विशेषण सामान्य रूप म्हणतात, उ॰ तो राजा, त्या राज्याला, इत्यादि.

## पुरुषसर्वनाम.

ज्या सर्वनामाच्या योगानें क्रियापदाचे पुरुष समजनात, त्याना पुरुष सर्वनामें म्हणतात, उ॰

| एकवचन. | अनेकवचन. | पुरुष. |
|---|---|---|
| मी. | आम्ही. | प्रथम पुरुष. |
| तूं. | तुम्ही. | द्वितीय पुरुष. |
| तो, ती, तें. | ते, त्या, ती. | तृतीय पुरुष. |

## ह्यांचीं सामान्य रूपें व अनेकवचनें.

| एकव॰ | सामा॰ | अने॰ | सामा॰ |
|---|---|---|---|
| मी. | म, मज. | आम्ही. | आम्हां |

| | | | |
|---|---|---|---|
| तूं. | तु, तुज. | तुम्ही. | तुम्हां. |
| तो. | त्या, त्याज. | ते. | त्यां, त्यांज. |
| ती. | ती, तिज. | त्या. | त्यां, त्यांज. |
| तें. | त्या, त्याज. | तीं. | त्यां, त्यांज. |

कोणत्या ही भाषणांत तिहीं पेक्षा अधिक पुरुष येत नाहींत; जो बोलतो तो आपणास प्रथम पुरुष, ज्या शीं बोलतो त्यास द्वितीय पुरुष, आणि ज्याविषयीं बो लतो, त्याला तृतीय पुरुष, असें कल्पितो. ह्या सर्वनामां तील मी आणि तूं, ह्यांचीं तृतीयेचीं एकवचनीं मीं, म्यां, तूं, त्वां आणि अनेकवचनीं आम्हीं, तुम्हीं अ शीं रूपें होतात, व ह्यांना षष्ठीचे एकवचनीं झा, झी, झें, हे प्रत्यय लागतात, परंतु अनेकवचनें आमचा, तुमचा अशींच होतात, आणि तो, ती, तें, ह्यांस वि कल्पें तृतीयेचे एकवचनीं णें, आणि अनेकवचनीं णीं हे प्रत्यय लागतात.

# दर्शकसर्वनाम.

ज्या सर्वनामें करून पदार्थ दाखविले जातात, त्यास दर्शक सर्वनाम म्हणतात. हीं मुख्य दोन आहेत. हा आणि तो.+ ह्यांत जवळचे पदार्थ दाखविणें असल्यास हा ह्याचा आणि दूरचे पदार्थ दाखविणें झाल्यास तो ह्याचा प्रयोग करितात. उ॰ हा ग्रंथ, तो विद्यार्थी. इ॰ ह्या दोन हीं सर्वनामांस विकल्पें तृतीयेचे एकवचनीं णें आणि अनेकवचनीं णीं हे प्रत्यय लागतात. हा ह्याचें सामान्य रूप ह्या किंवा या असें होतें, प्रथमेचीं अनेकवचनें हे, ह्या किंवा या, हीं अशीं होतात.

ह्या दर्शक सर्वनामांचीं असा, असला, असल्याला, इतका, इतकाला, एवढा, एवढाला, तसा, तसला, तसलाला, तितका, तितकाला, तेवढा, तेवढाला, अशीं

+ जेव्हां तो ह्याचा वाक्यांत नुसता प्रयोग होतो, तेव्हां त्याला पुरुष सर्वनाम, आणि जेव्हां नामास दर्शविण्या करितां प्रयोग होतो (म गतें नाम कोठें ही असो), तेव्हां दर्शक सर्वनाम असें म्हणतात.

रूपें होतात. जी हीं दर्शक सर्वनामें होत. परंतु ह्यां पुढें विशेष्यांचा योग असल्यास हीं विशेषणें मानावीं.

## संबंधी सर्वनाम.

जीं सर्वनामें निरंतर दर्शक सर्वनामांशीं जोडलीं असतात, त्यांना संबंधी सर्वनामें म्हणतात; उ॰ जो, जितका, जितकाला, जेवढा, जेवढाला, जसा, जसला, जसलाला, इत्यादि. ह्यांतील जो ह्यास हा आणि तो ह्यांच्या प्रमाणें तृतीयेचे प्रत्यय लागतात. जो ह्याचें सामान्यरूप ज्या असें होतें, आणि अनेकवचनें जे, ज्या, जीं, अशीं होतात.

## प्रश्नार्थक सर्वनाम.

ज्या सर्वनामें करून प्रश्नाचा बोध होतो, त्यांना प्रश्नार्थक सर्वनामें म्हणतात; उ॰ कोण, कोणता, कोणचा, काय+, कसा, केवढा, कितका, किती, कितीक, इ॰.

+ काय हें केव्हां अव्ययही होतें; उ॰ त्यां मारिलें काय?

ह्यांतील काय आणि कसा ह्यांचीं द्वितीयादि विभक्तींचीं रूपें एक सारिखीं होतात, परंतु वस्तूचा बोध होत असेल, तर तें काय ह्याचें रूप, आणि प्रकाराचा बोध होत असेल, तर कसा ह्याचें रूप समजावें; उ० कशानें मारिलें, त्याची कीर्ति कशानें झाली, इत्यादि.

## सामान्य सर्वनाम.

ज्या सर्वनामें करून साधारण रूपानें पदार्थांचा बोध होतो, त्यांना सामान्य सर्वनामें म्हणतात; उ० कोणी, काय, अमुक, अमका, फलाणा, आपण, सर्व, अवघा, सगळा, भलता, भलतसा, कांहीं, कसा, स्वतां*, हरएक, वरकड, परस्पर, अन्योन्य, इ० ह्यांतील कोणी+ ह्याचीं प्रथमे शिवाय कोण ह्या सारिखीं रूपें होतात व आपण+ हा शब्द प्रायः बहुवचनीं नी

* स्वतां 'स्वतः' हें केव्हां अव्यय ही होतें; उ० मी स्वतां आलों, इत्यादि.

\+ कोणी व आपण ह्या शब्दांची तृतीया, प्रथमे सारिखीच आणावी; परन्तु केव्हां कोणी त्यावर अनुस्वार देतात. जसें कोणीं.

न पुरुषांचा वाचक असून, त्याला षष्ठीचे लां*, ली, लें, हे प्रत्यय लागतात, तेव्हां णकाराचा लोप होतो; उ॰ आपण, आपला, इत्यादि.

## विशेषण.

नामादिकांचा चांगला किंवा वाईट गुणदाखविणारा जो शब्द, त्यास विशेषण म्हणतात; उ॰ शाहाणा मुलगा, एक मुलगी, इ॰; ह्यांत शाहाणा, एक, हीं विशेषणें, आणि मुलगा, मुलगी, हीं विशेष्यें होत. ह्यांचे गुणविशेषण आणि संख्याविशेषण असे मुख्य दोन भेद आहेत. ह्यांना नामाप्रमाणें लिंग, वचन, विभक्ति इत्यादि सर्व कार्यें होतात; बऱ्या विशेषणांचीं विशेष्यें द्वितीयादि विभक्तिक किंवा सशब्दयोगिक असतात, त्यांचीं सामान्यरूपें मात्र होतात, त्यांना विशेषण सामान्यरूपें म्हणतात.

---

* ला, ली, लें, ह्या प्रत्ययांचा आपण हा शब्द कधीं अव्यय ही होतो; उ॰ मी आपला एथें च बसेन, इत्यादि.

## गुणविशेषण.

केवळ गुण दाखविणारीं विशेषणें तीं गुण विशेषणें होत; उ० उदार, शूर, लहान, वाईट, एकजण, दोघे जण, एकपट, दुप्पट, द्विगुणित, त्रिगुणित, शहाणा, चांगला, पांढरा, लंगडा, बहिरा, हलका, दोषी, पैठणी, विश्वासू, भुकाळू, कडू, इ०. ह्यांतील आकारान्त विशेषणां शिवाय दुसऱ्यांस लिंगवचनाचीं कार्यें व विशेषण सामान्य रूपें प्रायः होत नाहींत.

## संख्याविशेषण.

संख्या दाखविणारीं विशेषणें तीं संख्या विशेषणें होत. ह्यांचे दोन भेद आहेत; एक, दोन, दोघे, तिघे, अर्धा, पाऊण, सवा तीन, साडे तीन, इत्यादि संख्या विशेषणें; पहिला, दुसरा, तिसरा, चवथा, पांचवा, इत्यादि क्रम संख्या विशेषणें होत.

## शब्दांचे मुख्य प्रकार.

नामें आणि विशेषणें ह्या शब्दांचे सिद्ध, सामासिक, आणि साधित, असे तीन प्रकार आहेत.

## सिद्ध.

जे शब्द दुसऱ्या शब्दांवरून साधलेले नव्हत ते सिद्ध शब्द होत; उ॰ पेरू, रथ, गोड, चांगला, इत्यादि.

## समास.

दोन किंवा अधिक शब्द एकत्र मिळून त्यांपासून जो एक शब्द सिद्ध होतो, त्याला समास म्हणतात. हे अव्ययीभाव, तत्पुरुष, कर्मधारय, मध्यमपदलोपी, द्विगु, बहुव्रीहि, आणि द्वंद्व, असे सात आहेत. समास करून दाखविण्याचा जो प्रकार त्याला विग्रह म्हणतात. ज्या पदांचा समास होतो, त्यांतील पहिल्या पदापुढील विभक्ति, आणि केव्हां केव्हां शब्दांचा शेवटील वर्ण, यांचा लोप होतो; परंतु बहुव्रीहि आणि [illegible] यांत द्वंद्व ह्यांशिवाय सर्व समास शब्दांस अंत्य पदांचें लिंग होतें.

## अव्ययीभाव.

शब्दांच्या मागें दर, हर, प्रति, इत्यादि किंनीएक उपसर्ग लागून जेव्हांनें सारें पद क्रियाविशेषण अव्यय होतें, तेव्हां त्याला अव्ययीभाव समास म्हणतात; उ० दरदिवस, दरघडी, हरएक, प्रतिवर्षी, इत्यादि.

## तत्पुरुष.

तत्पुरुष समासांत पुढलें पद मुख्य असतें, आणि समास झाल्यावर पहिल्यापदापुढील ज्याविभक्तीचा किंवा विभक्त्यर्थक अव्ययाचा लोप होतो त्याविभक्तीच्चें नाव समासास होतें; उ० द्वितीयातत्पुरुष, "द्विजास नमों दंडतो,, द्विजदंडलोचखाऊ, आगलाव्या, इ० तृ० त० "गजानें जी मोजणी तो गजमोजणी, रोगग्रस्त, घृतपक्व, इ० च० त० "पोळीकरितां तोपाटतो,, पोळपाट, कृष्णार्पण, इ० पं० त० "पत्रापासून जो च्युत तो,, पत्रच्युत, आचारभ्रष्ट, इ० ष० त० "केळीचें जें फूल तें,, केळफूल, रा-

जवाडा, इ॰ स॰ त॰ "स्वर्गाच्या ठायीं जो वासतो,, स्वर्ग-वास, वनगाय, गृहस्थ, इ॰ नभूतपुरुष; "नव्हे जो ज्ञतो, अज्ञ, अबोला, अनर्थ, इत्यादि उदाहरणें जाणावीं.

## कर्मधारय.

विशेषणाच्या जवळ विशेष्य असतां, किंवा दोन पदें उपमान, उपमेय, ह्या रूपानें असतां, कर्मधारय समास होतो, उ॰ "काळें असें जें मांजर तें,, काळमांजर, तांबलमाती, चुलतभाऊ, निमगोरा, चक्रवाद, मुखकमल, विद्याधन, इत्यादि.

## मध्यम पदलोपी.

ज्यांत परस्परान्वयी तीन पदांचा समास होऊन मधल्या पदाचा लोप होतो, त्याला मध्यमपदलोपी समास म्हणतात; उ॰ "गुळानें युक्त जो अंबा तो,, गुळांबा, दहीभात, साकरभात, पंचबीस, सत्तेचाळीस, इ॰.

## द्विगु.

ज्यांत संख्या वाचक पूर्व पद असून समुच्चयार्थी पूर्वोत्तर पदांचा समास होतो, त्याला द्विगु म्हणतात उ० "पांच पाळ्यांचा समाहार तें,, पंचपाळें, पंचारती, पंचांग, त्रिभुवन, पंचखाजें, बारभाई, इत्यादि.

## बहुव्रीहि.

ज्या शब्दांचा समास होऊन त्यापासून भिन्नपदार्थाचा बोध होतो, त्याला बहुव्रीहि म्हणतात; उ० "चार आहेत भुज ज्यास तो,, चतुर्भुज, चक्रपाणि, शशिशेखर, लक्ष्मीकान्त, रघुवंशभूषण, इ०; ह्या समासानें झालेले शब्द प्रायः विशेषणें असतात.

## द्वंद्व.

दोन किंवा अनेक शब्दांचा समास होऊन मध्यच्या "आणि,, ह्या अव्ययाचा ज्यांत लोप होतो, त्याला द्वंद्व म्हणतात, ह्याचे दोन भेद आहेत; उ० "माय आणि लेंकरूं तीं,, मायलेंकरें, आईबापें, इ०, हा परस्पर

योग द्वंद्व होय, आणि शेला पागोटें, ढाल तरवार, मी-ठभात, भाजीभाकर, इ॰ समाहार द्वंद्व होय. पहिल्या भेदाच्या समास शब्दास अनेकवचन आणि दुसऱ्या भेदाच्या समास शब्दास एकवचन होतें.

## साधित.

कित्ती एक शब्दांस स्वार्थी किंवा दुसऱ्या अर्थी प्रत्यय लागून शब्द होतात त्यांस साधित शब्द म्हणतात; ह्यांचे गुणवाचक शब्द साधित आणि धर्मवाचक शब्द साधित असे मुख्य दोन भेद आहेत.

### गुणवाचक शब्द साधित.

शब्दार्थाचा गुण त्याच शब्दांत निरंतर रहातो तेव्हां त्याला गुणवाचक शब्द साधित म्हणतात. ह्यांत काहीं नामें आहेत व काहीं विशेषणें आहेत. त्यांत आ, ऊक, ई, एल, कर, करी, खोर, गंड, डा, दार, नीस, वणी, वार, इत्यादि प्रत्यय लागून गुणवाचक शब्द साधित ना-

में होतात; उ॰ कणगा, पुराणिक, शास्त्री, उद्देळ, काशीकर, महालकरी, हरामखोर, म्हादगंड, म्हारडा, मामलेदार, चिटनीस, गुळवणी, उमेदवार, इ॰ आणि आळू, इक, इत, इष्ठ, ई, ईक, ईट, ईन, ईल, का, चाट, बाज, मती, मान्, मंत, या, रा, ला, वट, वती, वाणा, वान्, वाला, वाळा, वंत, स, इत्यादि प्रत्यय लागून गुणवाचक साधित विशेषणें होतात; उ॰ भुकाळू, प्रापंचिक, आनंदित, बलिष्ठ, मल्हारपाही, खर्चीक, रागीट, कुलीन, मागाळु, लाडका, घरचा, खारट, रांडबाज, श्रीमती, शक्तिमान्, श्रीमंत, मांग्या, लाजरा, नेथला, भोळसट, सौभाग्यवती, आजिरवाणा, दैववान्, घोडेवाला, लेंकुरवाळा, भाग्यवंत, डोळस, इत्यादि.[+]

## धर्मवाचक शब्द साधित.

---

+ ह्यांत जी नामें लिहिलीं आहेत तीं प्रयोग यथान् विशेषणें, आणि विशेषणें आहेत तीं नामें ही होतात, उ॰ मी मोठा काशीकर आहे, आली पैठणी वा, इत्यादि.

ज्या शब्द साधिता पासून धर्मांचा म्हणजे वृत्तीचा बोध होऊन मायः अमूर्त पदार्थ दाखविला जातो, त्याला धर्मवाचक शब्द साधित म्हणतात. आई, इ-मा, ई, की, गिरी, ता, त्व, पण, पणा, य, इत्यादि प्रत्यय लागून धर्मवाचक शब्द साधित नामें होतात. उ॰ धिट्टा-ई, महिमा, चाकरी, पाटिलकी, गुलामगिरी, निर्मलता, द्विजत्व, ब्राह्मणपण, उपाध्येपणा, चातुर्य, इत्यादि.

## क्रियापद.

कृति किंवा स्थिति अशा अर्थांचे जे शब्द त्यांस धातु म्हणतात, आणि त्या धातूंस प्रत्यय लागून जीं रूपें होतात, त्या प्रत्येकास क्रियापद म्हणतात. उ॰ धरितो, निजतो, मोडलें, उजाडतें, असवा, निजवितो, बोलवतें, पाहिजे, इ॰. ह्यांचे मुख्य प्रकार दोन; त्यांत सकर्मक, अकर्मक, उभयविध, भावकर्तृक, आणि सहाय, ह्या अर्थावरून, आणि प्रयोजक, शक्य, गौण म्हणजे

सिद्ध, ह्या रूपावरून आहे. क्रियापदास भेद, रूप, लिंग, वचन, पुरुष, अर्थ, काळ, प्रयोग, हीं असतात.

## सकर्मक क्रियापदें

सकर्मक क्रियापद म्हणजे क्रियेचा व्यापार कर्त्यापासून निघून अन्यावर म्हणजे कर्मावर घडतो+ तें; उ॰ खंडू साप धरितो. ह्यांत धरणें ही क्रिया करणारा (कर्ता) खंडू, त्याचा धरण्याचा व्यापार सापावर घडला म्हणून साप हें कर्म, आणि ह्या कर्माचा योग धरितो ह्या क्रियापदास आहे, ह्याजकरितां हें सकर्मक क्रियापद होय. ह्याच प्रमाणें देतो, घेतो, नेतो, करितो, इत्यादि क्रियापदें जाणावीं.

## अकर्मक क्रियापदें

जेव्हां क्रियेचा व्यापार कर्त्यावरच रहातो, तेव्हां तें अकर्मक क्रियापद होय; उ॰ विठू निजतो. ह्यांत

---

+ क्रियेचा व्यापार करितो त्यास कर्ता आणि तो व्यापार ज्यावर घडतो त्यास कर्म म्हणतात.

विठू हा कर्त्ता असून निजण्याचा व्यापार त्यावरच राहिला, म्हणून हें अकर्मक क्रियापद जाणावें. ह्याचप्रमाणें हंसतो, बसतो, जातो, इत्यादि.

कोणत्याही क्रियापदाच्या पूर्वी कर्मस्थानीं काय हें सर्वनाम लावून उत्तर आलें, तर तें सकर्मक, आणि न आलें, तर अकर्मक समजावें. उ॰ काय धरितो? अमुक धरितो, असें उत्तर येतें, म्हणून हें सकर्मक, आणि काय निजतो? ह्याचें उत्तर येत नाहीं, म्हणून हें अकर्मक होय. तो निजतो काय? एथें काय शब्द लावून उत्तर येईल परंतु तो क्रियापदाच्या पूर्वी कर्मस्थानीं लावला नाहीं.

## उभयविध क्रियापदें.

जें क्रियापद सकर्मक आणि अकर्मक ही होतें, तें उभयविध होय. उ॰ त्यानें हात भरिला, हें सकर्मक आणि त्याचा हात भरला, हें अकर्मक जाणावें. ह्याचप्रमाणें मोडलें, उघडलें, भाजलें, इत्यादि क्रियापदें होत

## भावकर्तृकक्रियापदें.

ज्या क्रियापदाचा अर्थ म्हणजे भाव च कर्त्ता असतो, त्याला भावकर्तृक क्रियापद म्हणतात. उ० उजाडतें, कळमळनें, मळमळनें, इ० ह्यांचा प्रयोग नपुंसक लिंगी, तृतीय पुरुषीं, एकवचनीं मात्र होतो.

## सहायक्रियापदें.

जें क्रियापद इतर धातुरूपापुढें योजिलें असतां त्याचा काळ, अर्थ, किंवा रूप फिरविनें, तें सहाय क्रियापद होय. उ० पों चला आहे, ह्याच प्रमाणें असला, नसला, होतो, जातो, येतो, देतो, इ० क्रियापदें जाणावीं.

## प्रयोजकक्रियापदें.

ज्या क्रियापदाच्या मुख्य कर्त्याचा व्यापार दुसऱ्या कर्त्यास प्रयोजक होतो, त्या क्रियापदास प्रयोजक क्रियापद म्हणतात. हें निरंतर सकर्मक असनें; उ० मी मुलास निजविनों, फिरविनों, जेवविनों, रडावि-

नों, इ० हीं क्रियापदें प्रायः मुळच्या अनेकाक्षरी धातूंस इव, आव, आणि एकाक्षरी व इकारान्त धातूंस विव, प्रत्यय लाविल्यानें होतात. परंतु कितीएक धातूंचीं प्रयोजक रूपें न घेतां त्या अर्थी निराळ्या धातूंचीं रूपें घेतात; उ० जातो, घालवितो, निघतो, पाठवितो, दिसतो, दाखवितो, इत्यादि.

## शक्य क्रियापदें.

ज्या क्रियापदापासून क्रियाशक्तीचा बोध होतो, त्याला शक्य क्रियापद म्हणतात; उ० माझ्यानें अथवा मला काम करवतो, करवतें, जाववतें, पहावतें, इ० हीं क्रियापदें मुळच्या अनेकाक्षरी धातूंस व आणि एकाक्षरी व इकारान्त धातूंस वव हे प्रत्यय लाविल्यानें होतात. परंतु सकर्मक धातूंस हे प्रत्यय लाविले असतां त्यांच्या ठायीं अकर्मकत्व येतें, आणि अकर्मक धातूंस लाविले असतां त्यांच्या ठायीं भावकर्तृत्व येतें.

## गौण अथवा सिद्ध क्रियापदें.

सहाय क्रियापदां पैकीं ज्यांचीं रूपें सर्वत्र न होतां, नियमित कालीं, नियमित अर्थीं, नियमित पुरुषीं, मात्र होतात, त्याला गौण क्रियापद म्हणतात; उ० मला विद्या पाहिजे, हवी, नको, नलगे, नये, इत्यादि.

## क्रियापदांचे भेद.

भिन्न भिन्न अर्थ मनांत आणून बोललें असतां क्रियापदाच्या रूपाचा जो बदल होतो, त्याला भेद म्हणतात. हे मूळ रूपभेद, प्रयोजक भेद, आणि शक्यभेद, असे तीन आहेत; उ० मी करितों हा मूळ रूप भेद, मी करवितों हा प्रयोजक भेद, आणि माझ्यानें अथवा मला करवतो, हा शक्य भेद जाणावा.

## क्रियापदाचीं रूपें.

क्रियापदास होय अथवा नाहीं ह्या अर्थाच्या धोरणानें चालविलें असतां जें त्याचें रूपांतर होतें, त्या

...रूप म्हणतात; उ० मी देतों, मी दिलें, मी देणार आहें, इत्यादिकांस करणरूप आणि मी देत नाहीं, मी दिलें-नाहीं, मी देणार नाहीं इत्यादिकांस अकरणरूप म्हणावें.

## क्रियापदाचें लिंग, वचन, पुरुष.

क्रियापदास नामादिकांप्रमाणें लिंग, वचन, पुरुष असतात; उ०

| | एकवचन. | | | अनेकवचन. |
|---|---|---|---|---|
| पुरुष | पुल्लिं० | स्त्री० | नपुं० | पुल्लिं० स्त्री० नपुं० |
| प्र०पु० | नेतों. | नेतें. / नेत्यें. | नेतें. | नेतों. |
| द्वि०पु० | नेतोस. | नेतेस. / नेतीस. | नेतेंस. | नेतां. |
| तृ०पु० | नेतो. | नेते. / नेती. | नेतें. | नेतात. |

## क्रियापदाचे अर्थ.

बोलणाराच्या मनांतील एकादी क्रिया करण्याचा भाव क्रियापदाच्या ज्या रूपावरून कळतो, त्याला अर्थ म्हणतात. हे स्वार्थ, विध्यर्थ, आज्ञार्थ, संज्ञार्थ, आणि संकेतार्थ, असे पांच आहेत.

स्वार्थ म्हणजे बोलणारा एकादी गोष्ट सांगतो किंवा विचारितो; उ० तो गेला, तूं काय करितोस? इ०.

विध्यर्थ म्हणजे बोलणाराच्या मनांत आज्ञेचा अर्थ असून, धर्म, शक्यता, योग्यता, मनोरथ, गतकथा, इ० अर्थ असतात; उ० त्यानें पोसावें, त्यानें जावें, त्यानें असें बोलावें? त्यांना पुत्र व्हावा, लहानपणी तेथें जावें, इ०.

आज्ञार्थ म्हणजे बोलणारा आज्ञा, उपदेश, किंवा प्रार्थना करितो; उ० तूं जा+; मुला, अभ्यास कर; हे राजा, संकट निवारण कर; इ०. हा अर्थ विध्यर्थाचा पोटभेद आहे.

+ कोणत्याही क्रियापदाचें आज्ञार्थी द्वितीय पुरुषी एकवचनांमें जे रूप होतें तो धातु जाणावा.

संशयार्थ हा क्रिया घडल्याचा संशय बोधवितो, उ॰ त्यानें पत्र पाठविलें असेल+, इत्यादि.

संकेतार्थ हा एका क्रियेची सिद्धि दुसऱ्या क्रियेवर आहे असें बोधवितो, उ॰ जर मी घेतों, तूं आतास, तर तो मारिता*, इ॰.

## काळ.

काळ म्हणजे क्रिया घडण्याचा समय, ज्याचा बोध क्रियापदाच्या रूपविशेषावरून होतो. हे वर्तमान, भूत, आणि भविष्य, असे मुख्य तीन आहेत.

## वर्तमानकाळ.

सांप्रत जो काळ चालत आहे तो वर्तमानकाळ. ह्याचे वर्तमान, अपूर्णवर्तमान, आणि रीतिवर्तमान, असे तीन भेद आहेत, उ॰ मी करितों, वर्तमानकाळ, मी करीत आहें—करितों आहें, अपूर्णवर्तमान-

---

+ ह्याला अस धातूचा योग पाहिजे.

* ह्याला जर, तर ह्या अव्ययांचा योग पाहिजे.

काळ, मी करीत असतों, रीतिवर्तमानकाळ. ह्या रिर निराळ्या भेदांचे अर्थ त्यांच्या त्यांच्या नावांवरून च समजतात.

## भूतकाळ.

पूर्वी गेला जो काळ तो भूतकाळ. ह्याचे भूत, अपूर्णभूत, रीतिभूत, पूर्णभूत, भूतभूत, वर्तमानभूत, आणि भविष्यभूत, असे सात भेद आहेत. उ० मी केला, भूतकाळ; मी करीत होतों, अपूर्णभूतकाळ; मी करीं-- करीत असें, रीतिभूतकाळ; मी करिता झालों, पूर्णभूतकाळ; मी केला होता, भूतभूतकाळ; मी केला आहे, वर्तमानभूतकाळ; आणि मी करणार होतों, भविष्यभूतकाळ; असें जाणावें.

## भविष्यकाळ.

पुढें येणारा जो काळ तो भविष्यकाळ. ह्याचे भविष्य, अपूर्णभविष्य, वर्तमानभविष्य, भूतभविष्य

ष्य, आणि भविष्यभविष्य, असे पांच भेद आहेत; उ० मी करीन, भविष्यकाळ; मी करित असेन, अपूर्णभविष्यकाळ; मी करणार आहें, वर्तमानभविष्यकाळ; मीं केला असेल, भूतभविष्यकाळ; आणि मी करणार असेन, भविष्यभविष्य काळ; असें जाणावें.

## प्रयोग.

वाक्यांत कर्ता, कर्म, आणि क्रियेचा भाव, ह्यांच्या अनुरोधानें क्रियापद असण्याचा जो प्रकार त्याला प्रयोग म्हणतात. हे कर्तरि, भावकर्तरि (कर्तरीचा पोटभेद), कर्मणि आणि भावीं, असे चार आहेत.

कर्तरि—कर्त्याचें लिंग, वचन, पुरुष, क्रियापदास असतात; म्हणून त्याला कर्तरि प्रयोग म्हणतात; ह्याचे अकर्मक आणि सकर्मक असे दोन भेद आहेत; उ० विठू निजतो, मल्हा पूजा करवते, हरि घर बांधितो, इ०.

भावकर्तरि—क्रियेचा अर्थ म्हणजे भाव तो वाक्यांत

कर्त्ता असतो, त्याला भाव कर्तरि म्हणतात, उ० उजाडतें, मला निजवतें, इत्यादि.

कर्मणि — कर्माचें लिंग, वचन, पुरुष क्रियापदास असतात, म्हणून त्याला कर्मणि प्रयोग म्हणतात. उ० रामानें गाय नेली, इत्यादि.

भावी — कर्त्याचें किंवा कर्माचें लिंग, वचन, पुरुष क्रियापदास नसून, केवळ तें तृतीय पुरुषीं, नपुंसक लिंगी एकवचनींच मुख्यतें असलें, म्हणजे त्याला भावी प्रयोग म्हणतात, उ० मी त्याला मारिलें, त्यानें जावें, इत्यादि.

## धातूचें चालिवणें.

धातूला लिंग, वचन, पुरुष, अर्थ, काळ, इत्यादि लावून दाखिवणें, त्याला धातूचें चालिवणें म्हणतात.

## असधातु.

ह्या धातूचीं वर्तमान काळीं तीन प्रकारचीं रूपें हो-

नात; वही इतर क्रियापदां पुढें विशेषें लाविलीं जाता न, म्हणून याचीं करणरूपीं, तीन पुरुषीं रूपें लिहितों.

## मूळरूपभेद, स्वार्थ, वर्तमानकाळ.

## कर्तरिप्रयोग, प्रकार पहिला.

| | एकवचन. | | | अनेकवचन. | | |
|---|---|---|---|---|---|---|
| लिंगें | मी. | तूं. | तो. | आम्ही. | तुम्ही. | ते. |
| ती० | आ-हें. | -हेस. | -हे. | आ-हों. | -हां. | -हेत. |

## प्रकार दुसरा.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ती० | हो-य. | -स. | -य. | होय. | व्हा. | होत. |

## प्रकार तिसरा.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पु० | अस-तों. | -तोस. | -तो. | अस-तों. | -तां. | -तात. |

## अपूर्ण वर्तमानकाळ.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ती० | असत आ-हें. | -हेस. | -हे. | असत आ-हों. | -हां. | -हेत. |

## रीति वर्तमानकाळ.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पु० | असत अस-तों. | -तोस. | -तो. | असत अस-तों. | -तां. | -तात. |

## भूतकाळ.

पु० हो-तों. -तास.-ता. हो-तों. -तेस,-ता.-ते.

## अपूर्णभूतकाळ.

पु० असतहो-तों.-तास.-ता. असतहो-तों.-तां.-ते.

## रीतिभूतकाळ.

ती० अ-सें. -सस. -से. अ-सूं. -सां. -सत.

## पूर्णभूतकाळ.

पु० असनाझा-लों.-लास.-ला. असतेझा-लों.-लां.-ले.

## भविष्यभूतकाळ.

पु० असणारहो-तों.-तास.-ता. असणारहो-तों.-तां.-ते.

## भविष्यकाळ.

ती० अ-सेन. -सशील. -सेल. अ-सूं. -साल.-सतील.

## अपूर्णभविष्यकाळ.

ती० असतअ-सेन.-सशील.-सेल. असतअ-सूं.-शाल.-सतील.

## वर्तमानभविष्यकाळ.

नी॰ असणार आ-हे. -हेस. -हे. असणार आ-हों.-हां. -हेत.

## विध्यर्थ, वर्तमानकाळ, कर्तरिप्रयोग.

पु॰ असा-वा. -वास. -वा. असा-वे. -वेत. -वे.

## भावीं प्रयोग, असावें तीनही पुरुषीं समान.

## भूतकाळ, कर्तरिप्रयोग.

पु॰ असावा हो-तो. -तास. -ता. असावे हो-तों. -तां. -ते.

## भावीं प्रयोग, असावे होते.

## भविष्यकाळ, कर्तरिप्रयोग.

पु॰ { असणार / असा-वा. } -वास. -वा. { असणार / असा-वे. } -वेत. -वे.

## आज्ञार्थ वर्तमानकाळ, कर्तरिप्रयोग.

नी॰ असूं. अस, ऐस. असो. अ-सूं. -सा. -सोत.

## संज्ञार्थ. वर्तमानकाळ, कर्तरिप्रयोग.

पु॰ असत अस-लों. -लास. -ला. असत अस-लों. -लां. -ले.

## भविष्यकाळ.

पु० {असणार / अस-लों} -लास -ला {असणार / अस-लों} -लों -ले.

## संकेतार्थ, भूतकाळ, कर्तरिप्रयोग.

पु० अस-तों. -नास. -ना. अस-तों. -नों -ते

## भविष्यकाळ.

पु० अस-ेन. -शील. -ेल. अस-ूं -ाल -तील.

## असधातूच्या प्रयोजकभेदनाहीं.

## शक्यभेद.

## स्वार्थ, वर्तमानकाळ.

भावकर्तरिप्रयोग, असवतें इत्यादि.

ह्यांतील अस ह्यास्थलीं नस धातु योजिल्यानें अकरण रूपें होतात; तीं व अन्य अर्थ, काळ, आणि लिंगें, ह्यांचीं रूपें वरील रूपांवरून जाणावीं. परंतु आज्ञार्थीं द्वितीय पुरुषीं मात्र, असूं नको असें रूप होतें हें लक्षांत ठेवावें.

आतां क्रियापदांच्या कोणत्याही रूपाचें व्याकर
ण करितां यावें, म्हणून पुढें ने हा सकर्मक धातु कर
्तृ रूपीं, सर्व अर्थीं, सर्व काळीं, कर्तरिप्रयोगीं, मूळरू
पा णि प्रयोजक भेदीं प्रथम पुरुषीं व शक्य भेदांत तृ
तीय पुरुषीं, पुल्लिंगीं, एकवचनीं, आणि कर्मणिप्रयोगीं,
पुल्लिंगीं, एकवचनीं, व भावीं प्रयोगीं, चालवून दाखवि
ला आहे. व ह्या धातूचीं ज्या काळचीं रूपें होत नाहींत, त्या
काळचीं दुसऱ्या धातूचीं रूपें लिहिलीं आहेत.

## ने धातु.

### मूळरूपभेद.

### स्वार्थ.

| | |
|---|---|
| प्र॰ नेतों. ...... वर्तमान. | प्र॰ नेत होतों. ... अ॰ भू॰ |
| प्र॰ नेत आहें. ...... अ॰ व॰ | प्र॰ नेईं, नेत असें. ... री॰ भू॰ |
| प्र॰ नेत असतों. ... री॰ व॰ | प्र॰ नेता झालों. ... पू॰ भू॰ |
| तृ॰ नेला. ........ भूत. | तृ॰ नेला होता. ... भू॰ भू॰ |

तृ० नेलाआहे. ··· व०भू०
प्र० नेणारहोतों. ·· भ०भू.
प्र० नेईन. ······ भविष्य.
प्र० नेतअसेन. ·· अ०भ०
प्र० नेणारआहें. व०भ०
तृ० नेलाअसेल. भू०भ०
प्र० नेणारअसेन. ·· भ०भ०

## विध्यर्थ.

तृ० न्यावा.
भा० न्यावें. } ···वर्तमान.

तृ० नेतअसावा.
भा० नेतअसावें. } ··अ०व०

तृ० न्यावाहोता.
भा० न्यावेंहोतें. } ··भूत.

प्र० बोललोंअसावा
तृ० नेलाअसावा
भा० नेलेंअसावें. } व०भू०

प्र० नेणारअसावा. भविष्य.

## आज्ञार्थ.

प्र० नेऊं. ····वर्तमान.

## संज्ञार्थ.

प्र० नेतअसलों. ·· वर्त०.

प्र० बोललोंअसलों
तृ० नेलाअसला.
भा० नेलेंअसलें. } भूत.

प्र० नेणारअसलों. भविष्य.
प्र० नेतअसेन. ·· अ०भ०
प्र० बोलतअसेन. ·· व०भ०

प्र॰ बोललों असेन.
तृ॰ नेला असेल.
भा॰ नेलें असेल. } भू॰भ॰
प्र॰ नेणार असेन. भ॰भ॰

## संकेतार्थ.

प्र॰ नेतों. ........ भूत.
प्र॰ नेत असतों. अ॰भू॰
प्र॰ बोललों असतों
तृ॰ नेला असता.
भा॰ नेलें असलें. } भू॰भू॰
तृ॰ नेला. ........ भविष्य.

## प्रयोजकभेदस्वार्थ.

प्र॰ नेववितों. वर्त॰.
त्याप्रमाणें मूळरूपभेदा
च्या आज्ञार्थाशिवाय त्या-

भेदाचीं सर्व रूपें ने पु-
ढें वव, व आज्ञार्थांतील
ने पुढें वव, आणि विध्य
र्थीं ज्या ज्या स्थलीं नेववा,
ला विल्या नें होतात; तीं
शिकणारांनीं चालवून
दाखवावीं.

## शक्यभेदस्वार्थ.

## कर्तरिप्रयोग.

तृ॰ नेववतो. वर्तमान.
त्याप्रमाणें मूळरूपभे-
दाचें तृतीय पुरुषीं, पु
ल्लिंगी, एकवचनीं जें रूप,
त्यांतील ने पुढें वव, आ-
णि ज्या ज्या स्थलीं नेववा

लाविल्यानें ह्या भेदांचीं सर्व रूपें होतात, तीं शि-
कणारांनीं चालवून दाखवावीं.

ह्या तीन ही भेदांतील जे धातू ज्या जेत, ह्या रूपापु-
ढें नस धातूचीं रूपें योजिल्यानें अकरण कसें होतात

## धातुसाधित शब्द.

धातूंवरून अनेकार्थी अनेक प्रत्यय होऊन सा-
धलेले जे शब्द, त्यांना धातुसाधित शब्द म्हणतात.
ह्यांचे नाम, विशेषण, आणि अव्यय असे तीन भे-
द आहेत. त्यांत अक, आ, आट, ई, ईव, ऊ, ऊं, एं, ण, णा,
णार, णावळ, णी, णूक, पें, इत्यादि प्रत्यय लागून धातु-
साधित नामें होतात, क्वचित धातूचें मूळरूपच धा-
तुसाधित नाम होतें, उ॰ शिक्षक, ठेवा, [illegible],
बुडी, चरीव, खाऊ, हंसूं, रडें, भांडण, तुकणा, मागणा-
र, खाणावळ, मळणी, [illegible], [illegible], [illegible].
आणि आऊ, आळू, [illegible], ऊ, अट, णाऊ, णाय, [illegible],

पट, रा, ला, लेला, इत्यादि प्रत्यय लागून धातुसाधि-
त विशेषणें होतात. उ॰ जळाऊ, खेळाडू, असावयाचा,
कळल्यानु, जळकातापट, देखणा, ऊधावणारा, रांग-
ता, धुपट, मोजगा, बांधला, सिंह, पाहिलेला, इ॰ ह्यांत-
जीं नामें लिहिलीं आहेत, तीं प्रयोगवशात् विशेष-
णें, आणि विशेषणें आहेत, तीं नामें होतात.

## धातुसाधित अव्ययें.

ज्या धातुसाधितांस लिंग, वचन, विभक्ति, इत्या-
दि कार्यें होत नाहींत; परंतु कित्येक काळ मात्र ला-
गतात, त्यांना धातुसाधित अव्ययें म्हणतात. हीं त,
तां, तांना, असतां, असतांना, ऊन, ऊं, आवें, इत्यादि
प्रत्यय लागून होतात. उ॰

नेत, नेतां, नेतांना. ...... वर्तमानकालवाचक.
नेतअसतां, नेतअसतांना. अपूर्णवर्त॰ का॰ वा॰.
नेऊन. ............ भूतकालवाचक.

नेऊं. ................ निमित्तवाचक.

न्यावें. ................ विधिवाचक.

## विभक्तींचे अर्थ.

### प्रथमा.

ह्या विभक्तीचे कर्त्ता, कर्म, परिमाण, आणि उद्देश, असे चार अर्थ आहेत, उ॰ विठू निजतो, ह्या वाक्यांत विठू ही कर्तरि प्रथमा, तो घर बांधितो, तो त्याला काठी मारितो, ह्यांत घर, काठी, ह्या कर्मार्थी प्र॰, एक पायली गहूं, मी बहुत शहरें फिरलों, ह्यांत पायली, शहरें, ह्या परिमाणार्थी प्र॰, विष्णु, चिंतु, हरि, ह्यांना धरून आण, नारायण म्हणून एक मुलगा होता, ह्यांत विष्णु, चिंतु, हरि, नारायण ह्या उद्देशार्थी प्र॰, असें जाणावें.

### द्वितीया.

ह्या विभक्तीचा अर्थ कर्म, उ॰ तो मला मारितो, ह्यांत मला ही कर्मार्थी द्वितीया होय.

## तृतीया.

ह्या विभक्तीचे कर्त्ता, करण, हेतु, अंगविकार, सह, सन्निधान, आणि गुण, असे सात अर्थ आहेत, उ० रामानें गाय दिली, ह्यांत रामानें ही कर्तरि तृतीया, मीं तरवारीनें वाघ मारिला, रिकाम्या हातीं देवास जाऊं नये, ह्यांत तरवारीनें, हातीं, ह्या करणी तृ०, तोगांव दुकळानें ओस पडला, ह्यांत दुकळानें ही हेत्वर्थी तृ० अंगानें पुष्ट, ह्यांत अंगानें ही अंगविकारी तृ०, तूं मळक्या वस्त्रानें फिरूं नको, ह्यांत वस्त्रानें ही सहार्थी तृ०, त्यानें मशीं कज्जा केला, ह्यांत मशीं ही सन्निधानी तृ०, मनानें मोकळा, ह्यांत मनानें ही गुणबोधक तृतीया होय.

## चतुर्थी.

ह्या विभक्तीचे संप्रदान, करण, अधिकरण, असे तीन अर्थ आहेत, उ० राजा ब्राम्हणास द्रव्य देतो, ह्यांत ब्राम्हणास ही संप्रदानी चतुर्थी, ह्या घोड्यास

शांरुपर्यंत चेतला, मला भात करवतो, ह्यांत रुप-
यांस, मला, ही करणी च०, पुण्यास गेला, ह्यांत पुण्या
सही अधिकरणी चतुर्थी जाणावी.

## पंचमी.

ह्याविभक्तीचा अर्थ अपादान म्हणजे वियोग; उ०
काशीहून आला, ह्यांत काशीहून ही अपादानार्थी
पंचमी होय.

## षष्ठी.

ह्या विभक्तीचे संबंध, करण, गुण, अपादान, आ-
णि अधिकरण, असे पांच अर्थ आहेत; उ० देवाची
घांट, ह्यांत देवाची ही संबंधार्थी षष्ठी, माझ्या बोल-
ण्याचा राग येतो, ह्यांत बोलण्याचा ही करणी षष्ठी;
मनाचा सोकळा, ह्यांत मनाचा ही गुणबोधक षष्ठी;
मी केळ्यांचा त्रास सांगतों आहें, ह्यांत केळ्यांचा ही
अपादानार्थी ष० रात्रीचा जागतो, ह्यांत रात्रीचा

ही अधिकरणार्थी षष्ठी जाणावी.

## सप्तमी.

ह्या विभक्तीचे अधिकरण, आणि अवधि, असे दोन अर्थ आहेत; उ॰ घरांत रहातो, ह्यांत घरांत ही अधिकरणी सप्तमी; मी क्षणांत येतों, ह्यांत क्षणांत ही अवध्यर्थी सप्तमी जाणावी.

## संबोधन.

ही विभक्ति दुसऱ्यास हाक मारणें किंवा त्याचें मन आपणाकडे ओढून घेणें ह्या अर्थी होते; उ॰ मुलांनों, देव हो, इ॰ हा प्रथमेचा भेद आहे.

## अव्यय.

ज्या शब्दास लिंग, वचन, विभक्ति इत्यादि कार्ये होत नाहींत, त्याला अव्यय म्हणतात; उ॰ जेव्हां, परंतु, पर्यंत, बहुधा, इ॰ ह्याचे क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी, आणि केवलप्रयोगी, असे चार भेद आहेत.

# क्रियाविशेषण.

ज्या शब्देंकरून क्रियेच्या गुणाचा अथवा प्रकाराचा बोध होतो, त्याला क्रियाविशेषण अव्यय म्हणतात. उ० लवकर येतो, हंसत बोलतो, फार चांगलें लिहितो, टपकन् उठला इ०. हीं शुद्ध अव्ययें, धातुसाधितें, शब्दविशेषणें (हीं प्रायः नपुंसकीं असावीं) आणि अनुकरणवाचकें, अशीं चार प्रकारचीं असतात.

ह्या अव्ययांचे कित्येक अर्थ पुढें लिहितों.

कालवाचक. जेव्हां, तेव्हां, केव्हां, एव्हां, आज, उद्यां, काल, परवा, एरवां, पूर्वीं, नंतर, यंदां, दरसाल, गुदस्तां, शेवटीं, वारंवार, इ०.

स्थलवाचक. जिकडे, तिकडे, इकडे, एथें, जेथें, तेथें, खालीं, वर, पुढें, मागें, घरोघर, इ०.

संख्यावाचक. एकदां, दोनदां, चारदां, शंभरदां, इ०.

क्रमवाचक. पहिल्यानें, दुसऱ्यानें, पांचव्यानें, इ०.

निश्चयार्थक. खचित, निःसंशय, निर्भ्रांत, इ०.

स्वीकारार्थक. उत्तम, होय, हां, खरें, ठीक, बरें, इ०.

अनुकरणवाचक. } फटकन्, टपकन्, झटदिनी, चटदिशीं, भसाभस, गटागट, गपागप, इ०.

## उभयान्वयी अव्यय.

ज्या अव्ययाचा अन्वय म्हणजे संबंध दोन शब्द अथवा दोन वाक्यें ह्यांकडे असतो, त्याला उभयान्वयी अव्यय म्हणतात. इ०. कदाचित्, किंबहुना, कीं, म्हणजे, तथापि, इ०.

### ह्या अव्ययाचे कित्येक अर्थ पुढें लिहितों.

+समुच्चयार्थक. आणि, व, आणखी, इत्यादि.

+न्यूनबोधक. परंतु, पण, प्रायः, प्रायशः, क्वचित्, इ०.

+पक्षबोधक. अथवा, किंवा, पक्षीं, नाहीं तर, किंबहुना, इ०.

+कारणबोधक. म्हणून, कारण, कां कीं, कां जर, यास्तव, इ०.

+संकेतवाचक. जर, तर, जरी, तरी, यद्यपि, तथापि, इ०.

---

+समुच्चय म्हणजे समुदाय, न्यून म्ह० कमी, पक्ष म्ह० बाजू किंवा भेद, कारण म्ह० हेतु, संकेत म्ह० अर्थ सुचविण्याचें कारण.

## शब्दयोगी अव्यय.

ज्या अव्ययाचा प्रयोग शब्दावांचून होत नाहीं, त्याला शब्दयोगी अव्यय म्हणतात, उ० विद्येवांचून विद्या नाश. वल विनय व सतो, ईश्वरच मोक्ष दाता आहे, इ० ह्याचे विकारक* आणि अविकारक असे दोन भेद आहेत.

## विकारक शब्दयोगी.

ज्या अव्ययाच्या योगानें मागील शब्दाचें सामान्यरूप होतें, त्याला विकारक शब्दयोगी अव्यय म्हणतात, उ० सभोंवता, शिवाय, वांचून, पावेतों, पर्यंत, बदल, ऐवजी, प्रमाणें, सारिखा, सन्निध, जवळून, वरती, इ० ह्यांशिवाय पूर्वीं जीं विभक्त्यर्थक आणि संबोधनार्थक अव्ययें सांगितलीं, तीं सर्व शब्दयोगी जाणावीं.

## अविकारक शब्दयोगी.

जें अव्यय शब्दयोगि असून, ज्या शब्दाशीं त्या-

---

* विकारक म्हणजे फेरफार करणारें आणि अविकारक म्हणजे फेरफार न करणारें.

न्या योग होतो, त्या शब्दानें सामान्यरूप होत नाहीं, त्याला अविकारक शब्दयोगी अव्यय म्हणतात. ह्या चे दोन भेद आहेत, उ॰ च, हीं, ना, देखील, पण, मात्र, इ॰ ह्यांना केवळ शब्दयोगी, आणि (मी आपला जा तों), आपला, मेला, परता, इत्यादिकांस वाक्यालं कारार्थक अव्यय म्हणतात.

## केवळप्रयोगी अव्यय.

ज्या अव्ययापासून हर्षशोकादिउद्गारांचा बो ध होतो, त्याला केवळप्रयोगी अव्यय म्हणतात. ह्या चे कित्येक अर्थ पुढें लिहितों, उ॰ छत्, छि; थू, ऊं:, अं: शिव शिव, विष्णवेनमः इ॰ धिक्कारार्थक; ऊं:, ऑं: आई आई, अरेरे, इ॰ दुःखवाचक; हा, अहा, अहाहा, अलल, अबब इ॰ आश्चर्यार्थक; वा; काय मौज, इ॰ हर्षवाचक; वाहवा, शाबास, भले, इ॰ धन्य तार्थक; जी, अहो इ॰ आर्जवार्थक अव्ययें होत.

## भागतिसरा, वाक्यरचना.

ज्याचा अर्थ पूर्ण होतो असा जो परस्परान्वयी शब्दांचा समुदाय त्यास वाक्य म्हणावें आणि त्यांतील शब्दांचा अर्थानुसंबंधानें जी जोडणी तिला वाक्यरचना म्हणतात. वाक्यें पूर्ण, अपूर्ण, आणि मिश्र, अशीं तीन प्रकारचीं आहेत. उ० तो गेला हें पूर्ण वाक्य. जो काल आला होता, हें अपूर्ण वाक्य. तो मी गेलों नाहीं, असें म्हणतो. हें मिश्रवाक्य. इत्यादि.

वाक्यांत कोणता तरी प्रयोग असतो. ते प्रयोग कर्तरि, कर्मणि, आणि भावी, असे तीन आहेत.

### कर्तरिप्रयोग.

ह्याचे अकर्मक कर्तरि, सकर्मक कर्तरि, आणि भाव कर्तरि, असे तीन भेद आहेत.

### अकर्मक कर्तरिप्रयोग.

पूर्वी प्रथमान्त कर्ता, नंतर अकर्मक धातूचें को

णत्याही काळाचें क्रियापद असून तें कर्त्याच्या लिंगवचनानुरूप असतें, त्याला अकर्मक कर्तरि प्रयोग म्हणतात; उ० मी रहातों, तूं गेलास, तो होईल, माझ्यानें अथवा मला भात करवतो, मला गणपती करितां येतो, मला निजावें लागतें, मला पूजा करावी लागते, इत्यादि.

## सकर्मककर्तरिप्रयोग.

प्रथमान्त कर्ता, नंतर प्रथमान्त किंवा (विशेषेंकरून सर्वनाम व प्राणिवाचक विशेषनाम असल्यास) द्वितीयान्त कर्म, आणि शेवटीं सकर्मक धातूंचें वर्तमान काळीं व भविष्य काळीं आणि पद धातूच्या गणांपैकीं कोणत्याही काळीं क्रियापद असून, कर्त्याला लिंगवचनानुरूप असतें, त्याला सकर्मककर्तरि प्रयोग म्हणतात; उ० हरि पुस्तक वाचितो, तो तु

+ पद [illegible]
ज, जेव, पाव, इत्यादि ह्या पद धातूचा गण होय.